दहशतवाद विरोधी पथकातील कार्यरत भारतीय पोलीस सेवेतील अधिकारी यांना सातव्या वेतन आयोगाच्या वेतनश्रेणीनुसार प्रोत्साहन (जोखीम) भत्ता मंजूर करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- एसएसए-१०१८/प्र.क्र.३०७/विशा-४**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांकः- ०५ मार्च, २०२०.**

वाचा:-१. शासन निर्णय, गृह विभाग क्र.एसएसए-१००३/१५(भाग-३)/विशा-४ दि. ०८ जुलै, २००४
२. शासन निर्णय, गृह विभाग क्र.एसएसए-१००३/१५(भाग-३)/विशा-४ दि.९ नोव्हेंबर, २००५
३. शासन निर्णय, गृह विभाग क्र.एपीओ-३६०५/प्र.क्र.३(ब)/पोल-३ दि. १७ फेब्रुवारी, २००६
४. शासन निर्णय, गृह विभाग क्र.एसएसए-१००६/प्र.क्र.३६३/विशा-४ दि. २३ एप्रिल, २००७
५. शासन निर्णय, गृह विभाग क्र.एपीओ-३१०६/१२१४/प्र.क्र.३११/पोल-३ दि.१४ जून, २००७
६. शासन निर्णय, गृह विभाग क्र.एपीओ-३१०६/१२१४/प्र.क्र.३११/पोल-३ दि.१४ जून, २००७
७. शासन निर्णय, गृह विभाग क्र.एपीओ-३१०८/६९७/प्रक्र.२८४/पोल-३ दि.७ ऑगस्ट,२००८
८. शासन निर्णय, गृह विभाग क्र.रापोसे-०५/२००१/प्र.क्र.१९२/पोल-१-अ दि.२२ सप्टें, २००८
९. शासन निर्णय, गृह विभाग क्र.एसएसए-१००६/प्र.क्र.३६३/विशा-४ दि.२३ जानेवारी,२००९
१०. शासन निर्णय, गृह विभाग क्र.एसएसए-१००९/प्र.क्र.१३५/विशा-४ दि.२६ मे, २००९
११. शासन निर्णय, गृह विभाग क्र.रापोसे-१३०८/प्र.क्र.२२८/पोल-१-अ दि.२२.१०.२००९
१२. शासन निर्णय, गृह विभाग क्र.एपीओ-३१०२/३८३६/प्रक्र३४०/पोल-३ दि.३१ डिसें, २००९
१३. अपर पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे दिनांक ११.०९.२०१८ चे पत्र.
१४. पोलीस उप आयुक्त, दहशतवाद विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे दिनांक १८.०१.२०२० चे पत्र.

**प्रस्तावना:-**

राज्यात दहशतवादी विरोधी कारवायांना त्वरेने व परिणामकारकपणे आळा घालण्यासाठी संदर्भ क्र.१ येथील दिनांक ०८.०७.२००४ च्या शासन निर्णयानुसार पोलीस आयुक्त, मुंबई यांच्या आस्थापनेवर दहशतवाद विरोधी पथकाची निर्मिती करण्यात आली. तसेच दहशतवाद विरोधी पथकातील अधिकारी/ कर्मचारी यांना शासन निर्णय, गृह विभाग दिनांक ०९ नोव्हेंबर, २००५ अन्वये प्रोत्साहन योजना लागू करण्यात आली आहे. या योजनेनुसार या पथकातील कार्यकारी पदावरील अधिकारी/ कर्मचारी यांना मूळ वेतन व त्यावरील महागाई भत्त्याच्या ५० टक्के रक्कम प्रोत्साहन भत्ता म्हणून मंजूर करण्यात आला होता.

२. राज्यात ७ वा वेतन आयोग लागू झाल्यानंतर, दहशतवाद विरोधी पथकातील कार्यरत भारतीय पोलीस सेवेतील अधिकारी यांना सातव्या वेतन आयोगाच्या वेतनश्रेणीनुसार प्रोत्साहन भत्ता मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याअनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

दहशतवाद विरोधी पथकातील खालील तक्त्यातील कार्यरत भारतीय पोलीस सेवेतील अधिकारी यांना सातव्या वेतन आयोगाच्या वेतनश्रेणीतील मूळ वेतनाच्या २५% इतकी रक्कम प्रोत्साहन (जोखीम) भत्ता म्हणून पूर्वलक्षी प्रभावाने मंजूर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | कार्यरत पदे |
|---|---|---|
| १ | अपर पोलीस महासंचालक | १ |
| २ | पोलीस महानिरीक्षक | १ |
| ३ | पोलीस उप आयुक्त (भा.पो.से. दर्जा) | २ |
| **एकूण** | | **४** |

दहशतवाद विरोधी पथकातील भारतीय पोलीस सेवेतील अधिकारी यांच्या प्रोत्साहन (जोखीम) भत्याबाबत खालील सूत्र अवलंबिण्यात यावे.

**सातव्या वेतन आयोगानुसार मिळणारे मूळ वेतन X ०.२५ = सातव्या वेतन आयोगामधील प्रोत्साहन (जोखीम) भत्ता.**

२. या रकमेवर कोणतेही भत्ते अनुदेय राहणार नाही. तसेच दहशतवाद विरोधी पथकातील कार्यरत भारतीय पोलीस सेवेतील अधिकारी मूळ घटकात परत गेल्यास त्यांना हा प्रोत्साहन (जोखीम) भत्ता देय होणार नाही.

३. याबाबतचा खर्च संबंधीत पदांचे वेतन व भत्ते ज्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येतात त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२७२/२०१९/व्यय-७, दिनांक १८.०२.२०20 अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२००३०५१७२४४१५६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Babasaheb Sadashiv Khandare
Date: 2020.03.05 17:27:25 +05'30'

**( बाबासाहेब स. खंदारे )**
**कक्ष अधिकारी, गृह विभाग**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री (गृह), महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा.राज्यमंत्री (गृह/ शहरे), महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.राज्यमंत्री (गृह/ग्रामीण), महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञयेता), महाराष्ट्र, मुंबई
८. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञयेता), महाराष्ट्र, नागपूर
१०.महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२.निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१३.पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१४.पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई
१५.अपर पोलीस महासंचालक, दहशतवादी विरोधी पथक, मुंबई
१६.पोलीस आयुक्त, पुणे, नाशिक, औरंगाबाद, नागपूर
१७.पोलीस अधीक्षक, नांदेड, अकोला
१८. वित्त विभाग (व्यय-७/सेवा-९), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१९.गृह विभाग, बीयुडी-१/पोल-१/पोल-१ अ/ पोल-५ ब, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२०. निवडनस्ती गृह विभाग (कार्या.-विशा-४)